९८८

20150422122950 8927

मुळा नदीवरील साकुर कोल्हापूर पध्दतीचा बंधारा (ता.संगमनेर, जि.अहमदनगर), या योजनेस द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.लपायो २००१/१७९०/(९/२००१) खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ५/१०/२००५

**पहावे**:- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचे दि.११/१२/२००० चे पत्र क्र.उमप्र/तां ३/कोपबं-९/६७२७/२०००

**प्रस्तावना**:-

मुळा नदीवरील साकुर कोल्हापूर पध्दतीचा बंधारा, ता.संगमनेर, जि.अहमदनगर या योजनेस शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक कोपबं २७९१/४११/(४८१/९२)/खा.भू, दि.१६/९/१९९४ अन्वये एकूण रु.८५.५७ लक्ष रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच शासन निर्णय, जलसंपदा विभाग, कोपबं १७९६/१५०५/(४५७/९६)/खाभू, दि.१४/२/२००० अन्वये रु.११७.५८ लक्ष इतक्या रकमेस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

या योजनेचे काम ऑक्टोबर,१९९७ मध्ये सुरु करण्यात आले, या योजनेचे काम पूर्ण होतांना दरसूचीच्या दरात झालेली वाढ, नव्याने तरतूदी प्रस्तावीत केल्यामुळे, सविस्तर सर्वेक्षणानुसार वाढ, इतर कारणांमुळे झालेली वाढ व अनुषंगिक खर्चातील वाढ यामुळे योजनेच्या किंमतीत वाढ होत आहे. त्यामुळे सन १९९९-२००० ची दरसूची वापरुन योजनेचे सुधारीत अंदाजपत्रक तयार करुन रु.१७०.३९ लक्ष किंमतीच्या प्रकल्पास द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचेकडून शासनास सादर करण्यात आला होता व तो प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. संदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासननिर्णय**:-

१) मूळा नदीवरील अहमदनगर जिल्हयाच्या संगमनेर तालुक्यातील साकुर कोल्हापूर पध्दतीचा बंधारा या योजनेस सन १९९९-२००० च्या दरसुचीवर आधारीत सुधारीत केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित रु.१,७०,३८,८३०/- (रु.एक कोटी सत्तर लक्ष अडतीस हजार, आठशे तीस फक्त, त्यापैकी १,४२,१८,८०५/- कामाप्रित्यर्थ व रु.२८,२०,०२५/- अनुषंगीक खर्च) खर्चास योजनेचे काम मंजूर रकमेत पूर्ण होईल या अटींच्या अधीन राहून द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधारे वरील भांडवली खर्च पचंवार्षिक योजनांतर्गत यांजना (१२०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (चार) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भागभांडवली अंशदान",या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातून भागवावा.

हा निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५५७/का-१४६९, दि.२४/१०/२००५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६६३/०४/व्यय-१२, दि.१८/८/२००५ अन्वये मिळालेल्या त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता अनुक्रमांक '३३' वर नोंदवण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( प्र. ना. कुलकर्णी )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी अदांजाच्या गोषवा-यासह:-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
मुख्य अभियंता (द व प्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर
आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.२, संगमनेर
उपसचिव (लघु पाटबंधारे)/अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थशाखा (५ प्रती)/ लपा-१/लपा-२/नियसं-३, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, अहमदनगर
स्वीय सहायक, मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.म.वगळून), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ)

25

(शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.लपायो २००१/१७९०/(९/२००१)/खारभूमी दि. ५/१०/२००५ चे सहपत्र)

## विवरणपत्र

### अंदाजपत्रकाचा गोषवारा

### साकुर कोल्हापूर पध्दती बंधारा ता.संगमनेर, जि.अहमदनगर

| अ. क्र. | उपशीर्ष | कामाची किंमत (रुपये) | |
|---|---|---|---|
| | | शिर्षकामे | एकूण |
| १ | ए-प्राथमिक | ४९,०३२ | ४९,०३२ |
| २ | बी-भूसंपादन | १,०९,५३१ | १,०९,५३१ |
| ३ | सी-कामे | १,३०,१०,७७४ | १,३०,१०,७७४ |
| ४ | डी.-विमोचक | -- | -- |
| ५ | इ-फॉल | -- | -- |
| ६ | एफ-आर.एच.टी.कामे | -- | -- |
| ७ | जी-पूल | -- | -- |
| ८ | एच्-एस्केप | -- | -- |
| ९ | के-इमारती | १,१९,९९७ | १,१९,९९७ |
| १० | एल-मातीकाम | -- | -- |
| ११ | एम-वृक्षरोपण | -- | -- |
| १२ | ओ-संकीर्ण | १०,००० | १०,००० |
| १३ | पी-देखभाल | १,१७,९७० | १,१७,९७० |
| १४ | आर-दळणवळण | ८,०१,५०१ | ८,०१,५०१ |
| | **एकूण** | १,४२,१८,८०५ | १,४२,१८,८०५ |
| | **कामाप्रीत्यर्थ** | १,४२,१८,८०५ | १,४२,१८,८०५ |
| | अधिक अनुषंगिक खर्च २५.२५ टक्के (भूसंपादन वगळून) | २८,२०,०२५ | २८,२०,०२५ |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | १,७०,३८,८३० | १,७०,३८,८३० |

### ठळक वैशिष्ट्ये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ३४० हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | ११५४८ स.घ.मी. |
| पाणीसाठ्याची प्रति स.घ.मी.किंमत (रु.) | ११००७ > ८५०० (आर्थिक मापदंडात बसत नाही) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.२४ > १.०० (आर्थिक मापदंडात बसते) |